**पदोन्नती आदेशात अंशत: बदल**
**उपअभियंता (स्थापत्य)**
**सार्वजनिक बांधकाम विभाग.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०१७/ प्र.क्र.७/सेवा-२
सार्वजनिक बांधकाम विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १४.०३.२०१७

**वाचा : शासन आदेश पीओजी २०१६/प्र.क्र. ११८/सेवा-२, दिनांक २९.७.२०१६**

## शासन आदेश

दिनांक १.९.१९९५ च्या पुरवणी निवड सूचीतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबतचे आदेश दिनांक २९.७.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. सदर आदेशान्वये श्री. प्रमोद जयराम घुडे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदोन्नती देऊन त्यांची पदस्थापना रा.म. उप विभाग, खामगांव येथे करण्यात आलेली आहे. सदर आदेशात सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, प्रशासकीय कारणास्तव अंशत: बदल करुन, त्यांची पदस्थापना रा.म. उप विभाग, खामगांव ऐवजी उप कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, यवतमाळ या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. प्रमोद जयराम घुडे, उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. श्री. घुडे यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव त्यांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात

येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांना देण्यात आलेली पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील याचीही त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री. प्रमोद जयराम घुडे, उप विभागीय अभियंता (स्थापत्य) यांच्या पदोन्नतीबाबतच्या अटी व शर्ती शासन आदेश क्रमांक-पीओजी-२०१६/प्र.क्र.११८/सेवा-२, दिनांक २९.७.२०१६ मध्ये नमूद केल्याप्रमाणेच कायम राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१७३४४९२५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.03.14 17:35:39 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.
३. जिल्हा कोषागार अधिकारी यवतमाळ
४. श्री. प्रमोद जयराम घुडे, उप विभागीय अभियंता यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांच्या मार्फत.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
७. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.